श्री ज्ञानदेवकृत गणेशवंदना २

माऊली ज्ञानदेवांनी केलेल्या गणेश वंदनेला अनेकानेक पैलू आहेत. (त्यापैकी `विविध महत्वपूर्ण बाबींना आपण यथाकाळ समजून घेऊच.) पण माऊलींच्या श्रीगणेश वंदनातील सर्वोपरी सुंदरतम ओवी कोणती? तर ---
तैसे प्रयाग होते सामरस्याचे!
वरी वोसान तरत सात्विकाचे!
ते संवाद चतुष्पथीचे
गणेश झाले! (१०/१२४)
केवळ शब्दार्थरीत्या, वरपांगी पाहता या ओवीचे वाच्यार्थ दोन भक्तांच्या भेटीचे हे वर्णन आहे. मात्र शांतपणे पाहता लक्षात येईल की हे संभवच नाही. दोन भक्तांची भेट हा "वदतो व्याघात" आहे 'दोन भक्त' ही शब्दरचनाच शास्त्र दृष्टया संभव नाही. भगवंताशी एकरूप म्हटल्यावर ते परस्परांशीही एकरूपच की.
मग काय आहे या ओवीचा नेमका अर्थ? तर ही ओवी गाणपत्य संप्रदायाच्या परिभाषेत समजून घ्यायला हवी. तरच जिचा नेमका अर्थ कळू शकेल.

या ओवीत तीन महत्वाची सूत्रे आहेत.

१) सामरस्याचे प्रयाग २) सात्विकाचे वोसान ३) चतुष्पथांचे संवाद. या तीनही संकल्पना श्रीमुदगल पुराणानुसार आपले एक वेगळेच अर्थ धारण करतात.
प्रथम आहे सामरस्य प्रयाग. प्रयाग म्हणजे त्रिवेणीसंगम गंगा, यमुना, सरस्वती या तीन नद्यांचा संगम. पण येथे केवळ जलप्रवाहाचे एकीकरण इतका सामान्य अर्थ नाही. कारण प्रयागालाही खरे तर दोनच प्रवाह दृश्य आहेत. मग काय आहे त्रिवेणी?

तीन हा शब्द आध्यात्मिक क्षेत्रात गुणांसाठीयोजिला जातो. त्या त्रिगुणांचा संदर्भ येथे अभिप्रेत आहे. यातील तमोगुण म्हणजे यमुना. काळेपणा, जडपणा इ. तमोगुणांची वैशिष्टे. यमुनेचे पाणी देखील तसेच काळे आहे. गंगा म्हणजे रजोगुण ऐकायला जरासे विचित्र वाटते. पण गंगेच्या गमन शिलतेचा संबंध रजोगुणाच्या कृतीप्रधानतेशी आहे म्हणून गंगा रजोगुण. तर तिसरी सरस्वती सत्वगुण. का? तर ती अदृश्य आहे.

तमोगुणाचे आलस्य आणि रजोगुणाचे क्रीयाशिलत्व दृश्य असते मात्र सत्वगुणाची परिणती असणारी शांती, समाधान, आनंद हा अनुभूतीचा भाग आहे. दृश्यत्वाचा नाही.

या तीनही गुणांचे एकत्रीकरण होते ते प्रयाग. या सगळ्या विश्वालाच प्रयाग म्हणतात.

दुस-या टप्प्यावर विचार आहे सात्विकाचे वोसान. वोसान म्हणजे कचरा. सत्वगुणाला कचरा म्हणणे सामान्यवाचकास अजब वाटेल. पण आध्यात्म शास्त्रात सत्वगुणासही त्याज्यच मानले आहे कारण शेवटी तो ही गुणंच आहे. त्याची युक्तताही 'सगुण' कारीच आहे.
अशा तीनही 'सगुण' त्व वृत्तिच्या प्रवाहाचे एकत्रीकरण प्रयाग. मात्र या प्रयागावर आहे. तीर्थ हे चवथे निर्गुणत्व. सगुणत्वाचे तीनप्रवाह तथा शांतस्वरूप चवथे तीर्थ या चार मार्गांना माऊली चतुष्पथ म्हणते. अध्यात्माचे हे चार मार्ग आहेत. या चारही मार्गांचा संवाद व्हायला हवा.
या चार मार्गांना गाणपत्य संप्रदायात आणखी एका वेगळ्या रुपात मांडले आहे. या चार मार्गांना चार देवतारुपात, चार तत्वरुपात मांडले आहे. असत, सत, सम आणि नेती अशा परिभाषेत या टप्प्यांना वर्णिले आहे. या चार ला चार 'ब्रह्म' म्हणतात.

असत ब्रह्म अर्थात हे जड जगत. जड देह. जस असला तरी त्याची एक क्षमता आहे सत्ता आहे. शक्ती आहे. याच कारणाने या स्तराला देवता भाषेत शक्तिब्रह्म म्हणतात.
या देहाला चालविणारे 'देही' रूप चैतन्य सत ब्रह्म. जडाच्या तुलनेत त्याचे अस्तित्व अधिक संपन्न, अत:ते सत या चैतन्याच्या प्रकाशात जडाचे प्रदर्शन घडत असल्याने या प्रकाशदायी तत्वास सुर्यब्रह्म म्हणतात.

या दोन्हीच्या समन्वयास म्हणतात सम ब्रह्म. कारण हे दोन्ही समानच आहेत. देह विनाशीच आहे आणि 'देही' पण हे देह सापेक्ष असल्याने त्या अर्थाने तोही सापेक्षरीत्या विनाशीच आहे. या दोन्हीच्या पार असणारे चैतन्य, ते दोन्हीत समान असल्याने त्यास समब्रह्म म्हणतात. ही चैतन्यावस्था परमव्यापक असल्याने तिला विष्णू ब्रह्म असे म्हणतात.

जड, तमोमय असत ब्रह्म, चैतन्यमय रजोगुणीसत ब्रह्म आणि दोन्हीचा पार वा दोन्हींना व्यापून असणारे सत्वगुणी समब्रह्म यांचे एकत्रीकरण म्हणजे प्रयाग. येथे 'सामरस्य' होते कारण हे तीनही गुणच. त्या समानतेच्या आधारे ते तीन एकत्र येतात.

अशा या एकत्रीकरणात सत्वगुण सगळ्यात श्रेष्ठ म्हणून तो वर असणे देखिल तरंगणे आहे आणि हे तरंगणे प्रवाहाशी संबंधित असल्याने माऊली रोसानाचा विचार करते.
या तीनही गुणांचे प्रवाहित्व एका जागी 'शांत' झाले की त्या कुंड रूप, तीर्थरूप अवस्थेला नेती ब्रह्म म्हणतात. प्रवाह नाही, दृश्यता नाही या अर्थाने ते नेती. शांत या अर्थाने स्थाणु. प्रवाहाची गतिशीलता नाही. ही शांत अवस्थाच अत्यंत पवित्र अत: ते शिवब्रह्म अन्य तीन गुण आणि त्या तिघांच्याही गतिशीलता स्थिर झाल्यावर गुणातीत असे ते शिवब्रह्म हे चार पंथ होत.

या चारी मार्गांच्या एकत्रीकरणास माऊली 'संवाद चतुष्पथीचे!' म्हणतात. असा संवाद झाला की त्या संवादासच माऊली 'गणेश' म्हणतात.
अर्थात सगुण आणि निर्गुण अशा दोन्हीचे एकत्रीकरण म्हणजे श्रीगणेश. सगुण निर्गुणाची एकवाक्यता म्हणजे श्रीगणेश याच कारणाने श्रीसमर्थही म्हणतात.

गणाधीश जो ईश सर्वागुणांचा
मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा!

सगुण शरीर आणि निर्गुण मस्तकाचे समन्वयरूप आहे माझा मोरया
माऊली आरंभवंदन करते ते अशा परब्रह्म गणराजाचे. श्रीगुरू अशाच गणराजाचा उपदेश करतात.
म्हणूनच तर माऊली म्हणते
तुमचा अनुग्रहो गणेशु!'
कसे? ते पुढील लेखात पाहू तोवर
जय गजानन!